“महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था सक्षम करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राभूअ-२०१८/प्र.क्र.३४/ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३१ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१) प्रधान सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली दि. २६.१०.२०१७ च्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) मा.मंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०६.०१.२०१८ च्या डिजीटल इंडिया लँड रेकॉर्ड मॉडर्नायझेशन कार्यक्रमाच्या आढावा बैठकीचे इतिवृत्त.
३) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडील पत्र क्रमांक राभूअआका-४/DLRMP/२०१७, दिनांक १०.०१.२०१८
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१८/प्र.क्र.३९७/ल-१, दि. ३१.०१.२०१९

**प्रस्तावना :-**

राज्यात डिजीटल इंडिया लँड रेकॉर्ड मॉडर्नायझेशन कार्यक्रमाची अंमलबजावणी महाभूमी प्रकल्प व्यवस्थापन संस्थेमार्फत सुरू आहे. राज्यात डिजीटल इंडिया लँड रेकॉर्ड मॉडर्नायझेशन कार्यक्रमातंर्गत ई-फेरफार, ई-अभिलेख प्रकल्पांची अंमलबजावणी सुरू आहे. सदर प्रकल्पांकरीता विकसीत करण्यात आलेल्या अज्ञावलींची भविष्यातील देखभाल व तांत्रिक सहाय्य (Maintenance and support)ही अतिशय महत्वाची व आवश्यक बाब असून, त्यासाठी महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेस सक्षम बनविणे अत्यंत गरजेचे आहे. महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेला बळकटी देण्यासाठी, तसेच ई अभिलेख व ई फेरफार प्रकल्पांना स्वयंसहाय्यित (self-sustainable) बनविण्यासाठी निधीची आवश्यकता आहे. त्यामुळे सदर निधी उभारण्यासाठी गा.न.नं. ७/१२, ८-अ या महसूली विभागाकडून पुरविण्यात येणाऱ्या सेवाकरीता आकारण्यात येणाऱ्या शुल्कापैकी काही शुल्क महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेस देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेला बळकटी देण्यासाठी, तसेच ई अभिलेख व ई फेरफार प्रकल्पांना स्वयंसहाय्यित (self-sustainable) बनविण्यासाठी आवश्यक असणाऱ्या निधीची उभारणी करण्याच्या दृष्टीने महाभूलेख संकेत स्थळावरुन डिजिटल स्वाक्षरीने तसेच तलाठी कार्यालयामार्फत तलाठयांच्या स्वाक्षरीने गा.न.नं. ७/१२ व ८-अ उतारे वितरीत करतांना आकारण्यात येणाऱ्या शुल्काची विभागणी पुढीलप्रमाणे आकारण्यात यावी व त्यामधून प्राप्त झालेल्या फी चा हिस्सा विविध घटकांना म्हणजेच महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेला प्राप्त होईल.

| अ.क्र. | गा.न.नं. ७/१२, ८-अ, फेरफार नमूना ९ ची नोटीस यांच्या प्रती वितरणाचे ठिकाण | सेवा शुल्क | विविध घटकांचा हिस्सा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | महाभूलेख संकेतस्थळ https://mahabhulekh.maharashtra.gov.in (फक्त माहितीसाठी, डिजिटल स्वाक्षरी शिवाय) | विनामुल्य | ---- |
| २ | महाभूमी संकेतस्थळ https://mahabhumi.maharashtra.gov.in (डिजीटल स्वाक्षरीने) | रुपये १५/- प्रत्येक प्रतीस | i)महाराष्ट्र शासन - रु.५/-<br>ii)महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था - रु.१०/- |
| ३ | तलाठी कार्यालय (तलाठी स्वाक्षरीने/डिजीटल स्वाक्षरीने) | रुपये १५/- प्रत्येक प्रतीस | i)तलाठी (कागद, प्रिंटींग, वीजबील इ.साठी) - रु.१०/-<br>ii)महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्था - रु.५/- |

२. उक्त प्रमाणे प्राप्त होणाऱ्या नक्कल फी च्या निधीचे व्यवस्थापन करण्यासाठी महाभूमी प्रकल्प व्यवस्थापन संस्थेने नक्कल फी व्यवस्थापन प्रणाली ( Online Accounting System ) विकसित करावी .

३. तलाठी लॉगीन ने ई फेरफार प्रकल्पांतर्गत संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ , ८ अ , फेरफार , नमुना ९ ची नोटीस इ. अभिलेखांच्या नकला वितरणातून तलाठ्याला प्राप्त होणाऱ्या रकमेपैकी महाभूमी प्रकल्प व्यवस्थापन संस्थेचा हिस्सा नक्कल फी व्यवस्थापन प्रणाली ( Online Accounting System ) मधून प्राप्त अहवाला प्रमाणे प्रत्येक मागील सप्ताहात जमा झालेली सदर रक्कम ही पुढील सप्ताहाच्या पहिल्या कामाच्या दिवशी स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये (कार्यान्वीत झाल्यानंतर) जमा करण्यात यावी.

४. महाभूमी प्रकल्प व्यवस्थापन संस्थेच्या संकेतस्थळावरून डिजिटल स्वाक्षरीने वितरीत होणाऱ्या नकला ची नक्कल फी सदर संस्थेच्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यात जमा होईल व प्रत्येक महिन्याच्या अखेरीला अशा प्राप्त नक्कल फी पैकी शासनाचा हिस्सा (रक्कम रुपये ५ प्रमाणे ) नक्कल फी व्यवस्थापन प्रणाली ( Online Accounting System ) मधून प्राप्त अहवाला प्रमाणे GRAS प्रणालीद्वारे शासनाच्या विहित लेखा शीर्षाखाली जमा करणे आवश्यक राहील .

५ . सदर निधीचा वापर ई-फेरफार, ई-अभिलेख या आज्ञावलीच्या देखभाल व तांत्रिक सहाय्य तसेच भविष्यात विकसित करण्यात येणाऱ्या आज्ञावली (ई-चावडी, भू नकाशा) साठीच करण्यात यावा. तसेच भविष्यात डिजिटल इंडिया लॅंड रेकॉर्ड मॉडर्नायझेशन कार्यक्रमाच्या अनुषंगाने इतर तत्सम बाबीसाठी त्यातून खर्च करावयाचा झाल्यास त्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समितीची आगाऊ मान्यता घेण्यात यावी.

६. भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २६६ व २०४ अनुसार कर व करेतर रूपाने प्राप्त होणारा महसूल राज्याच्या एकत्रित निधीचा भाग बनेल आणि कायद्याव्दारे केलेल्या विनियोजनाखाली असेल त्याखेरीज राज्याच्या एकत्रित निधीतून कोणतेही पैसे काढता येणार नाहीत. परंतु, “एक विशेष बाब” म्हणून परिच्छेद क्र. १ मध्ये दर्शविलेल्या तक्त्यानुसार [२ (ii) व ३ (ii)] विहीत निधी महाभूमी व्यवस्थापन संस्थेच्या स्वीय प्रपंजी लेख्या (PLA) मध्ये जमा करण्याची अनुमती वित्त विभागाने दिली आहे.

७. संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये अधिकार अभिलेख/नकाशांची नक्कल वितरणातून प्राप्त होणऱ्या निधीची रक्कम SBIe pay Online मार्फत स्विकारण्यासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे येथे स्वतंत्र बँक खाते (Depository Account) उघडण्यास मान्यता देण्यात आली आहे.

८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर स्वीय प्रपंजी लेख्यातील जमा व खर्चाचा ताळमेळ महालेखापालाकडे वेळोवळी देण्याची दक्षता घ्यावी. तसेच सदर निधीबाबत आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणापत्रासह शासनास पाठवावे.

९. सदर शासन निर्णयातील सूचना सर्व विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व महसूल अधिकारी व कर्मचारी यांच्या निदर्शनास आणून द्याव्यात.

१०. जनतेच्या माहितीसाठी सदर शासन निर्णयास जिल्हास्तरावर तसेच तालुकास्तरावर व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. याबाबतची जबाबदारी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांची तसेच तालुकास्तरावर तहसिलदार यांची राहील.

११. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२५/१८/को.प्र.-५, दि. १८.१२.२०१८अन्वये प्राप्त सहमीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११५१८२८९०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2019.01.31 15:29:01 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
सह सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
४. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव.

६. अपर मुख्य सचिव (वित्त) / प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान)
७. सर्व विभागीय आयुक्त
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर
१२. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती